**राज्यात एक सारख्या असलेल्या योजना एकत्रित करुन त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करुन योजना कमी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.२१८/(भाग-२)/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- ०३ फेब्रुवारी, २०१७**

वाचा :- नियोजन विभागाचे अर्ध शासकीय पत्र क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२६/का.१४११, दि.१४.०७.२०१५

**प्रस्तावना :-**

नियोजन विभागाने राज्यात एकसारख्या असलेल्या योजना एकत्रित करुन त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करुन योजना कमी करणे या KRA च्या मुद्यांच्या अनुषंगाने राज्य स्तरावर व जिल्हास्तरावर द्विरुक्तीने कार्यरत असलेल्या योजना, ज्या योजनांचा नियतव्यय मागील सलग ३ वर्षापासून शुन्य आहे अशा योजना बंद करणे व केंद्रशासनाने सन २०१५-१६ पासून अकार्यान्वीत (Delinked) केलेल्या योजना कमी करणे या अनुषंगाने निदेश दिले आहेत. सदर निदेशांच्या अनुषंगाने नियोजन विभागाने काही निकष निश्चित केले आहेत.

सदर निकषांच्या आधारे संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या विभागामधील योजनांतर्गत योजनांचा आढावा घेऊन ज्या योजनांची जिल्हा व राज्य स्तरावर द्विरुक्ती आहे अशा योजना, एकाच प्रयोजनार्थ कार्यान्वीत अनेक योजना, ज्या योजना मर्यादित कालावधीकरीता सुरु करण्यात आल्या असून त्यांचा कालावधी संपुष्टात आला आहे अशा योजना, केवळ आस्थापनाविषयक बाबीकरीता सुरु ठेवण्यात आलेल्या योजना बंद करुन योजनांची संख्या कमी करणे तसेच राज्यात एकसारख्या असलेल्या योजना एकत्रित करुन त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करुन योजनांची संख्या कमी करण्याबाबत नियोजन विभागाने संदर्भाधिन अर्ध शासकीय पत्रान्वये कळविले आहे. त्याअनुषंगाने, वन विभागामधील अशा स्वरुपाच्या योजना बंद करणे / अन्य योजनेमध्ये विलीन करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-:**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे नियोजन विभागाच्या संदर्भाधीन अर्ध शासकीय पत्रान्वये निश्चित केलेल्या निकषाच्या आधारे वन विभागातील ज्या योजनांची जिल्हा व राज्य स्तरावर द्विरुक्ती आहे अशा योजना, एकाच प्रयोजनार्थ कार्यान्वीत अनेक योजना, मर्यादित कालावधीकरीता सुरु करण्यात आलेल्या योजना बंद करण्याचा निर्णय घेण्यात आला असून यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

I) राज्यस्तरावर द्विरुक्तीने कार्यरत असलेल्या योजनांच्या अनुषंगाने या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या वन विभागातील एकूण ८ योजना ह्या त्यांना पुरक / समान स्वरुपाच्या असलेल्या योजनांमध्ये संमिलीत करण्यात येत आहेत.

II) केंद्र पुरस्कृत योजनांमधील तेरावा वित्त आयोगाचा कालावधी संपले ला आहे. त्यामुळे तेराव्या वित्त आयोगाअंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानासंदर्भातील या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ-ब मध्ये नमूद केलेली योजना बंद करण्यात येत आहे.

III) या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-क मध्ये नमूद केलेल्या वन विभागातील ज्या योजनांचा नियतव्यय मागील सलग ३ वर्षापासून शून्य आहे अशा एकूण ३१ योजना बंद करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या पत्र क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३५/भाग-२/का.१४११, दि.२९.०८.२०१६ मधील सुचनेनुसार निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०३१६२८४९२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.02.03 16:38:10 +05'30'

सोबत :- परिशिष्ट अ, ब, क

**(डि.एल.थोरात)**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री (वने), यांचे खाजगी सचिव
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक सर्व
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३, अर्थ-६) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) मुख्य वनसंरक्षक सर्व, / वनसंरक्षक सर्व
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५) /(१४११), मंत्रालय, मुंबई-३२.
१३) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## परिशिष्ट - अ

## राज्यस्तरावर द्विरुक्तीने कार्यरत असलेल्या योजना कमी करुन त्यांना पुरक / समान स्वरुपाच्या असलेल्या योजनांमध्ये समाविष्ट करणे

| योजनेचा स्तर | योजनेचा संकेतांक | विभागास कमी करावयाच्या योजनेचे नांव व CRC क्रमांक | ज्या योजनेत समाविष्ट करावयाची आहे त्या योजनेचा संकेतांक | ज्या योजनेत समाविष्ट करावयाची आहे त्या योजनेचे नांव व CRC क्रमांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अ) राज्यस्तर | ११०१०३०००२ | १) मृदसंधारणार्थ वनीकरण (४४०६००४४) | ११०१०७०००१ | १) वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६०४९२) | स्तंभ क्र.३ मधील अ.क्र.१ व २ येथील योजनांमध्ये वनरोपनाची कार्यवाही करण्यात येत असल्याने सदर दोन योजना स्तंभ क्र.५ येथील अ.क्र.१ येथील"वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम" या योजनेत समाविष्ट करण्यात येत आहेत. |
| | ११०१०८००१९ | २) निवडलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेत्तर सामुहीक क्षेत्रावर वृक्षलागवड (२४०६८५९८) | | | |
| | ११०१०७०००६ | ३) खाजगी वनांचे सर्व्हेक्षण व सिमांकन (४४०६००७१) | ११०१०७००१२ | २) वनाचे सर्वेक्षण व सिमांकन (४४०६००५३) | या दोन्ही योजनांचे कामांचे स्वरूप एकसमान असल्याने सदर दोन्ही योजना "वनांचे सर्वेक्षण व सिमांकन" या योजनेत समाविष्ट करण्यात येत आहेत. |
| | ११०१०७०००४ | ४) १६ वन स्थानकांचे बांधकाम (२४०६२१८८) | ११०१०७०००७ | ३) प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६००२६) | स्तंभ क्र.३ मधील अ.क्र.४ व ५ येथील योजनांमध्ये बांधकाम हा घटक असल्याने त्या योजना स्तंभ क्र.५ येथील अ.क्र.३ येथील"प्रशासकीय इमारतीचे बांधकाम "या योजनेत समाविष्ट करण्यात येत आहेत. |
| | ११०१०७००३४ | ५) चेक नाक्याचे बांधकाम (२४०६२१४१) | | | |
| | ११०१०७००२४ | ६) वन्यजीव क्षेत्रात आवश्यक ती बांधकामे करणे (२४०६ २२२१) | ११०१०७०००८ | ४)वन्यजीव व निसर्ग संवर्धन (२४०६०७७५) | या दोन्ही योजनांमधील कामे एकमेकांना पुरक असल्याने सदर दोन्ही योजना "वन्यजीव व निसर्ग संवर्धन" या योजनेतसमाविष्ट करण्यात येत आहेत. |
| | ११०१०७००३३ | ७) बिनतारी संदेश यंत्रणेचे बळकटीकरण (२४०६ २१२३) | ११०१०७००३५ | ५) फिरत्या पथकाचे सक्षमिकरण (२४०६२१६१) | या दोन्ही योजना वनसंरक्षण कामाच्या बळकटीकरणाशी संबंधित असल्याने सदर दोन्ही योजना "वनसरंक्षण कामाचे बळकटीकरण", २४०६ २१६१ या लेखाशिर्षाखाली समाविष्ट करण्यात येत आहेत. |
| | ११०१०७००१७ | ८) प्रसिध्दी व विस्तार (४४१५०१४५) | ११०१०८००२० | ६) जाहिरात, प्रचार, प्रसिध्दी व इतर प्रशिक्षण (२४०६८५८९) | प्रसिध्दी व विस्तार (४४१५०१४५) ही योजना सन २०१६-१७ पासून जाहिरात, प्रचार, प्रसिध्दी व इतर प्रशिक्षण (२४०६८५८९) या योजनेमध्ये समाविष्ट करण्यात आली आहे. |

**परिशिष्ट - ब**

**बंद करावयाच्या केंद्र पुरस्कृत योजना**

| **योजनेचा स्तर** | **योजनेचा संकेतांक** | **विभागास कमी करावयाच्या योजनेचे नांव व CRC क्रमांक** | **शेरा** |
| --- | --- | --- | --- |
| **केंद्र पुरस्कृत योजना CSS** | ११०१०७०७४१ | तेराव्या वित्त अयोगाच्या शिफारशी नुसार वनव्यवस्थापनासाठी केंद्रीय सहाय्य (२४०६७२२३) | तेराव्या वित्त आयोगाचा कालावधी सन २०१४-१५ मध्ये संपलेला आहे. तसेच सन २०१३-१४ पासून सदर वित्त आयोगासंदर्भातील निधीची तरतूद योजनेत्तर तरतूदीमधून करण्यात येत होती. यास्तव सदर योजना बंद करण्यात येत आहे. |

## परिशिष्ट - क

### ज्या योजनांसाठी सातत्याने मागील ३ वर्षापासून शून्य तरतूद दर्शविली जात आहे अशा बंद करावयाच्या योजना

| योजनेचा स्तर | योजनेचा संकेतांक | विभागास कमी करावयाच्या योजनेचे नांव व CRC क्रमांक | शेरा |
|---|---|---|---|
| राज्य / जिल्हा | - | १) Construction of Building at Forest Training School (४४१५०१६३) | सदर योजनांची विभागास सध्या आवश्यकता नाही. त्यामुळे, त्या योजना कमी/रद्द करण्यात येत आहेत |
| | - | २) Establishment of Wild Life Organisation/ Maintenance of Tiger Safari (२४०६२१९७) | |
| | - | ३) Forest communication Mandva to Ghogarwadi Road.(४४०६००१७) | |
| | - | ४) Replantation and organisation of deforested forest(२४०६७४८४) | |
| | ११०१०७०७५४ | ५) Village Eco Development Programme | |
| | ११०१०८००२१ | ६) Preparation of Management plan for non-forest lands & Private forest land in sacred forests | |
| | ११०१०८००२२ | ७) TRAINING FOR CAPACITY BUILDING () | |
| | ११०१०८००२६ | ८) Afforestation Programme in Nagarpalika & Municipal Corporation | |
| | - | ९) Dule,Dhadgoan Plantation under Special Action Plan (२४०६२०८१) (TSP) | |
| | - | १०) Supply of Vehicles for Forest Protection. | |
| | - | ११) Creation of Forest Custody | |
| | - | १२) Development. of Fuelwood and Fodder Project. | |
| | - | १३) Construction of Watch Towers. | |
| | - | १४) Control of Forest Fire through Satellite | |
| | - | १५) Insurance for Forest Officers / Employees - Handling Arms | |
| | - | १६) Demarkation of Area of Applicant According to Forest Dwellers Act २००६ | |
| | - | १७)Supply of Arms and Ammu. to PA staff. | |
| | - | १८)Capital for Van Aushadhi Mahamandal | |
| | - | १९)Forest Wireless Network. | |

| योजनेचा स्तर | योजनेचा संकेतांक | विभागास कमी करावयाच्या योजनेचे नांव व CRC क्रमांक | शेरा |
|---|---|---|---|
| | - | २०)Development of Infrastructure in Forest and Wildlife Area | |
| | - | २१) Regeneration and Redevelopment of Forest Cover | |
| | - | २२)Evaluation of Forest Development Work through Outsider Institution | |
| | - | २३)Maharashtra Forestry Project-Creation of project co-ordination unit | |
| | - | २४) Japan Bank for International Co-operation Project | |
| | - | २५) Wild Life Nature Conservation Including State Share of Tiger Project | |
| | - | २६) Digging of Borewell With Hand Pumps Near Forest Protection Huts | |
| | ११०१०७००१० | २७) Ajantha Ellora Project | |
| | - | २८) Erection of Forest Protection Huts at Strategic Point. | |
| | - | २९) Establishment of Wireless Net Works | |
| | ११०१०७००३० | ३०) Compensation to Farmers in Lieu of Crop Damages by Wild Animals. | |
| | - | ३१) Estt. of Tiger Safari in SGNP through FDCM. | |